जिल्हाधिकारी व अपर जिल्हाधिकारी यांना
<u>देण्यात आलेले विषय</u>

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण ०२/२०१२/प्र.क्र.४३/ई-१**
३२ वा मजला, सेंटर १ इमारत, जागतिक व्यापार केंद्र,
कफ परेड, मुंबई-४०००05.
दिनांक : ०४.१०.२०१३

**संदर्भः-१)शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्रमांकः संकीर्ण ०२/२०११/प्र.क्र.१३/ई-१, दि.२९.०३.२०१२**
**२) शासन पत्र समक्रमांक दि. २८.१२.२०१२**

**परिपत्रक**

जिल्हा स्तरावर कार्यरत असलेले जिल्हाधिकारी व अपर जिल्हाधिकारी यांनी हाताळावयाच्या विषयांबाबत उपरोक्त संदर्भान्वये प्रशासकीय आदेश निर्गमित करण्यात आलेले आहेत. यामध्ये "**ब**" व "**क**" वर्ग नगरपालिका क्षेत्रातील तसेच ग्रामीण भागातील अकृषीक परवानगीबाबतची प्रकरणे अपर जिल्हाधिकाऱ्यांनी हाताळण्याबाबत उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील आदेशान्वये सूचना देण्यात आल्या आहेत.

२. तथापि, या अनुषंगाने शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, प्रशासकीय सोय म्हणून असे विषय वाटप विहित करण्यात आले असले तरी काही ठिकाणी "**ब**" व "**क**" वर्ग नगरपालिका क्षेत्रातील तसेच ग्रामीण भागातील अकृषीक परवानगीबाबतचे उपविभागीय अधिकारी व तहसिलदार यांना देण्यात आलेले अधिकार काढून घेण्यात येऊन ते अपर जिल्हाधिकाऱ्यांकडे सुपूर्द करण्यात आले आहेत. यामुळे ग्रामीण भागातील नागरीकांस नाहक त्रास सहन करावा लागत आहे.

३. संदर्भाधीन परिपत्रकान्वये दिलेल्या सूचनांनुसार, सदर विषय अपर जिल्हाधिकाऱ्यांनी प्रशासकीयदृष्ट्या संनियंत्रित करणे अपेक्षित होते. सबब ग्रामीण भागातील नागरीकांची गैरसोय होऊ नये म्हणून शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, सर्व जिल्हाधिकारी व अपर जिल्हाधिकारी यांनी असे उपरोक्त दि.२८.१२.२०१२ च्या शासन पत्रातील निर्देशानुसार कार्यवाही करतांना महाराष्ट्र जमीन महसूल संहिता १९६६ च्या कलम १३ (१) मधील तरतूद विचारात घेऊन खालील तक्त्यात दर्शविल्यानुसार अकृषीक आकारणीस परवानगी देण्याबाबतच्या अधिकारांचे प्रत्यायोजन उपविभागीय अधिकारी अथवा यथास्थिती तहसिलदार यांना करण्यात यावे. :-

| अ.क्र. | पदनाम | विषय |
|---|---|---|
| १. | जिल्हाधिकारी | महानगरपालिका व "अ" वर्ग नगरपालिका हद्दीतील जमीनीचे व्यवस्थापन व अकृषीक परवानगी |
| २. | अपर जिल्हाधिकारी | "ब" व "क" वर्ग नगरपालिका हद्दीतील अकृषीक परवानगी |
| ३. | उपविभागीय अधिकारी | वर्ग-१ गावांसाठी अकृषीक परवानगी |
| ४. | तहसिलदार | वर्ग-२ गावांसाठी अकृषीक परवानगी |

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेताक २०१३१००४१३२८२००११९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madhav Narayan Kale

Digitally signed by Madhav Narayan Kale
DN: CN = Madhav Narayan Kale, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2013.10.04 14:55:01 +05'30'

**( माधव काळे )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

१. सर्व विभागीय आयुक्त.
२. सर्व जिल्हाधिकारी.
३. मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
४. मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
५. सर्व अपर जिल्हाधिकारी.
६. महसूल व वन विभाग/का.क्र. टी-१, महसूल व वन विभाग, ३२ वा मजला, सेंटर १ इमारत, जागतिक व्यापार केंद्र, कफ परेड, मुंबई-४०० ००५.
७. निवडनस्ती, ई-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, ३२ वा मजला, सेंटर १ इमारत, जागतिक व्यापार केंद्र, कफ परेड, मुंबई-४०० ००५.